# महाराष्ट्र शासन

<u>तात्काळ</u>

क्रमांक:सीईआर-१२११/स्वा.दि/प्र.क्र.८४/११/३०,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २५ जुलै, २०११.

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी.

विषयः- <u>स्वातंत्र्य दिनाचा ६४ वा वर्धापन दिन समारंभ</u>
**१५ ऑगस्ट, २०११.**

स्वातंत्र्य दिनाचा ६४ वा वर्धापनदिन दिनांक १५ ऑगस्ट, २०११ रोजी राज्यात विभागीय मुख्यालये, जिल्हा मुख्यालये, उप विभागीय मुख्यालये, तालुका मुख्यालये येथे ध्वजारोहणाच्या समारंभाने साजरा करण्यात येईल. विभागीय आयुक्त पुणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती, कोकण यांनी आपआपल्या विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणी असा समारंभ साजरा करण्याची योग्य ती व्यवस्था कृपया करावी. मुंबई येथे मा. मुख्यमंत्री यांच्या हस्ते ध्वजारोहण होईल. पुणे येथे मा. राज्यपाल यांच्या हस्ते ध्वजारोहण होईल. सर्व विभागीय व जिल्हा मुख्यालयांच्या ठिकाणी त्या त्या जिल्हयाच्या पालकमंत्री महोदयांच्या हस्ते राष्ट्रध्वजारोहण होईल. कोकण विभागीय मुख्यालय वाशी नवी मुंबई येथे मा. श्री. जयंत पाटील, मंत्री , ग्रामविकास, धुळे येथे मा. श्री. राजेंद्र गावित, राज्यमंत्री, आदिवासी विकास, कामगार यांच्या हस्ते राष्ट्रध्वजारोहण होईल. संबंधित प्रांत अधिकारी व तहसिलदार हे जिल्हा उपविभागीय व तालुका मुख्यालये येथे ध्वजारोहण करतील.

२. दिनांक १५ ऑगस्ट, २०११ रोजी ध्वजारोहणाचा मुख्य शासकीय समारंभ राज्यभर एकाच वेळी म्हणजे सकाळी ९.०५ वाजता आयोजित करण्यात यावा. जास्तीत जास्त व्यक्तींना या मुख्य शासकीय समारंभात भाग घेता यावा यासाठी त्यादिवशी सकाळी ८.३५ ते ९.३५ च्या दरम्यान ध्वजारोहणाचा किंवा इतर कोणताही शासकीय किंवा निम शासकीय समारंभ करण्यात येऊ नये. जर एखादया कार्यालयाला अथवा संस्थेला आपला स्वतःचा ध्वजारोहण समारंभ करावयाचा असल्यास त्यांनी तो त्या दिवशी सकाळी ८.३५ च्या पूर्वी किंवा ९.३५ च्या नंतर करावा.

३ राष्ट्रध्वजाला वंदन करताना जन-गण-मन हे राष्ट्रगीत वाजविले जाईल. सलामीच्या वेळी सज्ज असलेला बँड सलामीपूर्वी व सलामीनंतर वाजवावा.

४. दिनांक १५ ऑगस्ट, २०११ रोजी महाराष्ट्र राज्यात सर्व सार्वजनिक व शासकीय इमारतींवर (खेडयांमध्ये सुध्दा) तसेच ऐतिहासिक महत्वाच्या किल्ल्यांवर उदा. रायगड, सिंहगड, शिवनेरी, पुरंदर, वसई, प्रतापगड, दौलताबाद, सिताबर्डी इत्यादी ठिकाणी राष्ट्रध्वज उभारण्यात यावा.

५. राष्ट्रध्वज लावण्याच्या योग्य पध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र.एफएलली-१०९१/३०, दिनांक २० मार्च, १९९१ तसेच क्रमांक एफएलजी-१०९१/(२)/३०, दिनांक ५ डिसेंबर, १९९१ अन्वये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. ध्वजारोहणाची रंगीत तालीम घेतली जाईल याची दक्षता घ्यावी. राष्ट्रध्वज चांगल्या स्थितीत आहे व सूर्यास्तास उतरवला जाईल याचीही दक्षता घ्यावी.

६. खासदार, आमदार, नगर सेवक, स्वातंत्र्य सैनिक, स्थानिक राजकीय पक्षांचे प्रमुख, दलित मित्र पुरस्कार प्राप्त व्यक्ती, स्थानिक शासकीय अधिकारी आणि प्रमुख नागरिक यांना मुख्य शासकीय समारंभास उपस्थित राहण्याचे निमंत्रण द्यावे.

७. सामुदायिक राष्ट्रगीत गायनाचा अंतर्भाव असलेले खास कार्यक्रम शाळा व महाविद्यालयात आयोजित करण्यात यावेत.

८. विभागीय आयुक्त, पुणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती हे त्यांच्या मुख्यालयात ध्वजारोहण समारंभाची व्यवस्था करणार असल्यामुळे तेथील जिल्हाधिका-यांनी वेगळे कार्यक्रम करण्याची आवश्यकता नाही. त्याचप्रमाणे मुंबईतील कार्यक्रमासाठी विभागीय आयुक्त , कोकण व जिल्हाधिकारी, मुंबई यांनी कार्यवाही करण्याची आवश्यकता नाही. मुंबई उपनगर जिल्हा येथे जिल्हाधिकारी ध्वजारोहणाची सर्व तयारी करतील. विभागीय आयुक्त, कोकण विभाग हे कोकण भवन येथील समारंभाची व्यवस्था करतील.

९. ध्वजारोहण समारंभाला सर्व शासकीय अधिकारी व कर्मचारी यांनी अगत्यपूर्वक उपस्थित रहाण्याबाबत आणि उपस्थित राहणा-या सर्व व्यक्तींना समारंभाच्या वेळी राष्ट्रीय पोषाख परिधान करण्याबाबत विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी कृपया आदेश द्यावेत.

१०. संबंधित विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी आपापल्या अधिकारक्षेत्रात स्वातंत्र्य दिन समारंभ साजरा करण्यासंबंधी आवश्यक ती कार्यवाही कृपया करावी. त्यांच्या अधिकार क्षेत्रात त्या दिवशी समारंभाबाबत सर्व बाबी योग्य त-हेने कार्यवाहीत येतील याबाबत त्यांनी व्यक्तीशः कृपया दक्षता घ्यावी.

११. मुंबईतील मंत्रालय, नवीन प्रशासकीय भवन, विधान भवन व नागपूर येथे विभागीय आयुकतांच्या कार्यालयीन इमारंतींवर विधान भवनावर व उच्च न्यायालयाच्या इमारतीवर विद्यूत रोषणाई करण्यात यावी.

२५/७/११

**शै.वि.बिजूर**
**सह सचिव व सह मुख्य राजशिष्टाचार अधिकारी.**

प्रत माहितीसाठी अग्रेषित :-
मुख्य सचिव,

सर्व प्रधान सचिव/सर्व सचिव, मंत्रालयीन विभाग,
राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई /पुणे (२ प्रती )
राज्यपालांचे परिवार प्रबंधक, राजभवन,मुंबई / पुणे (२ प्रती )
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (५ प्रती) ( पत्राने )
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ( पत्राने )
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने )
प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई ( पत्राने )
प्रबंधक, लोक आयुक्त,महाराष्ट्र राज्य , मुंबई ( पत्राने )
फ्लॅग ऑफिसर कमांडिंग इन चीफ, वेस्टर्न नेव्हल कमांड, मुंबई,
जनरल ऑफिसर कमांडिंग, महाराष्ट्र व गुजरात विभाग, मुंबई,
एअर ऑफिसर कमांडिंग, हेडक्वॉटर्स, मेरीटाईम एअर ऑपरेशन्स, आयएएफ,आयएएफ बिल्डींग, धोबी तलाव,मुंबई -४०० ०२०,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
स्टेशन कमांडर, इंडियन एअर फोर्स स्टेशन, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
केंद्र संचालक, दूरदर्शन, वरळी, मुंबई नं. ४०० ०१८,
केंद्र संचालक, आकाशवाणी, मुंबई, नागपूर ,पूणे , औरंगाबाद,
पोलीस आयुक्त, मुंबई, नागपूर ,पूणे , औरंगाबाद,ठाणे, सोलापूर, नवी मुंबई,
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका,
महानगरपालिका आयुक्त, नागपूर ,पूणे , औरंगाबाद ,ठाणे, सोलापूर,कोल्हापूर, कल्याण, अमरावती, पिंपरी- चिंचवड, नाशिक, नवी मुंबई,
सर्व पोलीस उप महानिरीक्षक,
महासमादेशक, नागरी संरक्षण दल, मुंबई,
जिल्हाधिकारी मुंबई, उपनगर जिल्हा ,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा,
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक,
महा लेखापाल-१ महाराष्ट्र, मुंबई (पत्राने),
महा लेखापाल-२ महाराष्ट्र, नागपूर (पत्राने),
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मुंबई,
संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सार्वजनिक बांधकाम विभाग,
वित्त विभाग,
समाजकल्याण व सांस्कृतिक कार्य विभाग,
शालेय शिक्षण विभाग / उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
इतर सर्व मंत्रालयीन विभाग (मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुखांना कळविण्याच्या विनंतीसह ),
सभापती महाराष्ट्र विधान परिषद/उपसभापती महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव,
अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव,
विरोधी पक्ष नेते विधान परिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव,
मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यमंत्री यांचे जनसंपर्क अधिकारी, मुंबई,
उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मंत्री राजशिष्टाचार यांचे खाजगी सचिव,
राज्यमंत्री,राजशिष्टाचार यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्र्यांचे आणि राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव /स्विय सहायक,
संचालक, क्रिडा व युवक सेवा सेंट्रल बिल्डींग पूणे,
कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग,मुंबई,
कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग-१, मुंबई,
कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग-२, मुंबई,
कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत विभाग/दक्षिण मुंबई विद्युत विभाग, मुंबई,
संचालक, उपवने व उद्याने, मुंबई.
निवडनस्ती.